**केंद्र शासन पुरस्कृत वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन योजनांतर्गत आदिवासी घटकाकरिता (TSP) सन २०२२-२०२३ मधील पहिला हप्ता मंजूर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. टिआरएस-०३/२०२३/प्र.क्र.९५/फ-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२३

**<u>वाचा</u> :-** १) केंद्र शासन, पर्यावरण व वन मंत्रालय, पर्यावरण भवन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३-२३/२००७-एफपीडी (पीटी. २) दिनांक २७.२.२०२३

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-१/सी/यो/ifms/प्रक्र.०२/५४९/२०२२-२३, दि.६.३.२०२३.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.टिआरएस-०९/२०२०/प्र.क्र.१०१(भाग-१)/फ-६, दि.२०.७.२०२२.

४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्रक्र.०४/का.६, दि.२९.३.२०२३.

**प्रस्तावना :-** वन विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या आदिवासी घटक कार्यक्रमांर्तगत केंद्र पुरस्कृत वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन या योजनेसाठी महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२३ च्या मार्च (अर्थसंकल्पीय) अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला केंद्र हिस्सा रु.३३५.२७ लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.२२३.५२५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास मान्यता दिली होती. त्यास अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदीतून आदिवासी विकास विभागाने त्यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत केलेला आहे. तसेच यापूर्वी संदर्भ क.३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०२१-२२ मध्ये आदिवासी घटकाकरिता (TSP) केंद्र हिस्सा अखर्चीत रु.४.४१ लक्ष व राज्य हिस्सा रु.२.९३ लक्ष असे एकूण रु.७.३४ लक्ष इतकी रक्कम SNA खात्यात जमा करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन वितरीत केलेला निधी SNA खात्यामध्ये जमा करुन खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-** वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन या केंद्र शासन पुरस्कृत योजनेंतर्गत आदिवासी घटकाकरिता (TSP) सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता रु.२२६४.५५ लक्षचा कृती आराखडा केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये मंजूर झालेला आहे. त्यानुसार केंद्र शासनाने या योजनेतंर्गत आदिवासी घटकाकरिता (TSP) पहिला हप्ता रु.३३९.६८ लक्ष (केंद्र हिस्सा ६० % पैकी २५ % अनुदान) मंजूर केलेला आहे. त्यास अनुसरुन राज्य शासनाचा हिस्सा (४०% पैकी २५%) रु.२२६.४५५ लक्ष होत

आहे. केंद्र शासनाने सन २०२१-२२ मधील राज्य शासनाकडे अखर्चीत असलेली रक्कम रु.४.४१ लक्ष ची रक्कम देखील उपरोक्त प्रथम हप्त्यात समाविष्ट करुन पहिल्या हप्त्यासाठी रु.३३९.६८ लक्ष मंजूर केलेला आहे. यापूर्वी संदर्भ क.३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०२१-२२ मध्ये आदिवासी घटकाकरिता (TSP) केंद्र हिस्सा अखर्चीत रु.४.४१ लक्ष व राज्य हिस्सा रु.२.९३ लक्ष असे एकूण रु.७.३४ लक्ष इतकी रक्कम SNA खात्यात जमा करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

२. योजना मागणी क्र.टी-५ अंतर्गत २४०६ वनीकरण व वन्यजीव, ०१ वनीकरण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना, (०१)(१४) वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन (२४०६ बी२९९) केंद्र हिस्सा ६० टक्के अनुदान रु.३३९.६८ लक्ष पैकी ०२-मजुरी व २१-साहित्य पुरवठा करिता व २४०६ वनीकरण व वन्यजीव, ०१ वनीकरण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना, (०१)(१३) वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन (२४०६ बी२८१) राज्य हिस्सा ४० टक्के रु.२२६.४५५ लक्ष पैकी ०२-मजुरी व २१-साहित्य पुरवठा करिता निधी खालीलप्रमाणे नमूद विवरणपत्रात दिलेल्या तपशिलानुसार केंद्र शासन पुरस्कृत वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन योजनांतर्गत आदिवासी घटकाकरिता (TSP) सन २०२२-२०२३ मधील पहिला हप्ता म्हणून केंद्र हिस्सा रु.३३९.६८ लक्ष पैकी रु.३३५.२७ लक्ष व राज्य हिस्सा रु.२२६.४५५ लक्ष पैकी रु.२२३.५२५ लक्ष असे एकूण रु.५५८.७९५ लक्ष इतका निधी उपरोक्त संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, वन विभाग यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS) वितरीत करण्यात आला आहे. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निधी SNA खात्यात जमा करुन मंजूर बाबीवर खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये लाखात)**

| विवरण | संगणक संकेतांक क्रमांक | केंद्र शासनाची एकूण मंजूरी | सन २०२२-२३ करिता २५ टक्के प्रथम हप्ता | सन २०२१-२२ मधील अखर्चीत असलेली परंतु SNA मध्ये जमा असलेली रक्कम | सन २०२२-२३ करिता प्रथम हप्त्यातील वितरीत करण्यात येत असलेली रक्कम | ०२ मजूरी (रकाना ८ पैकी) | २१ साहित्य व पुरवठा (रकाना ८ पैकी) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (८) | (९) | (१०) |
| केंद्र हिस्सा (६० टक्के) | (२४०६ बी२९९) | १३५८.७३ | ३३९.६८० | ४.४१ | **३३५.२७** | २८६.५२३ | ४८.७४७ |
| राज्य हिस्सा (४० टक्के) | (२४०६ बी२८१) | ९०५.८२ | २२६.४५५ | २.९३ | **२२३.५२५** | १९१.०२२ | ३२.५०३ |
| | एकुण | २२६४.५५ | ५६६.१३५ | ७.३४ | **५५८.७९५** | ४७७.५४५ | ८१.२५ |

तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयाअन्वये SNA खात्यात जमा करण्यात आलेल्या एकूण रु.७.३४ लक्ष इतकी रक्कम सन २०२२-२३ मध्ये खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदान योजनेतील मंजूर कामांवर खर्च करण्यात यावा.

२. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी केंद्र शासनाने मंजूर केलेल्या APO प्रमाणे कार्यबाबीवर खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

अ) मान्यता दिलेल्या खर्चाच्या तपशीलवार बाबी केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भीय पत्रांमध्ये नमूद केल्या आहेत. सदर कामांना सक्षम प्राधिकाऱ्याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने आदिवासी घटकाकरिता (TSP) दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची जबाबदारी राहील.

ई) वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व परिपत्रकांचे काटेकोर पालन करावे.

३. सदर निधी मागणी क्र.टी-५ अंतर्गत २४०६ वनीकरण व वन्यजीव, ०१ वनीकरण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना, (०१)(१४) वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन(केंद्र हिस्सा ६० टक्के) (२४०६ बी२९९) व २४०६ वनीकरण व वन्यजीव, ०१ वनीकरण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना, (०१)(१३) वनवणवा प्रतिबंध व व्यवस्थापन(राज्य हिस्सा ४० टक्के) (२४०६ बी२८१) च्या सन २०२२-२०२३ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी नागपूर कोषागारातून आहरित करण्यात यावा व त्याकरिता Estate Officer, प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांचा DDO Code :-४६०१०००७६१ असा आहे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६.३.२०२३ ला अनुसरुन, तसेच आदिवासी विकास विभागाचे अनौ.संदर्भ क्र.१२६/का.६, दि.२१.३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११४१६०३१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=cd9b7c852f06815dc15baee9beaa952cb59250169fcb3d489150789e0cc31ca6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6025E577A0EE54FAED5D6081093A5E1F8E2B15125A14DDE66E1EA3AFA9BC2CF5, cn=PINGALE BHANUDAS NARAYAN
Date: 2023.03.31 14:22:30 +05'30'

**(भानुदास पिंगळे)**
**उप सचिव (वने) महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) सर्व,
५. वनसंरक्षक (वन्यजीव), सर्व
६. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, अर्थ-६, व्यय-१०, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. कार्यासन अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. ब-१/फ-२/फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३. फ-६ कार्यासन (निवड नस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.